**साठे चित्रमंदिर, आष्टा या एकपडदा चित्रपटगृहास करमणूक शुल्क सवलत देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ईएनटी२०१४/प्र.क्र.९२/टी-१

३२ वा मजला, सेन्टर वन इमारत
जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई ४०० ००५
तारीख: २२ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-**

**शासन निर्णय क्रमांकः ईएनटी-२०१३/प्र.क्र.३३/टी-१, दि. २८ फेब्रुवारी, २०१४**

**प्रस्तावना :-**

पुणे विभागातील, सांगली जिल्हयातील, आष्टा येथील "साठे चित्रमंदिर" या एकपडदा चित्रपटगृहास या चित्रपटगृह व्यवस्थापनाने करमणूक शुल्क भरणा करण्यासंदर्भात अनियमितता केल्याचे निदर्शनास आल्याने विभागीय आयुक्त, पुणे यांनी करमणूक शुल्क सवलत देणेकरिता सशर्त हेतूपत्र प्रदान करण्यास मान्यता देण्यासंदर्भात सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. **साठे चित्रमंदिर, आष्टा या एकपडदा चित्रपटगृहास या शासन निर्णयाच्या दिनांकापासून प्रथमत: १ वर्ष कालावधीकरिता करमणूक शुल्क माफी प्रदान करण्यात येत आहे. विभागीय आयुक्त कार्यालयाने यानुसार सशर्त हेतूपत्र प्रदान करावे**.

या चित्रपटगृह व्यवस्थापनाने शासन निर्णयातील सर्व अटींचे पालन केले आहे किंवा कसे याबाबत जिल्हाधिकारी सांगली यांनी १ वर्षानंतर आढावा घ्यावा. अनियमितता न आढळल्यास विभागीय आयुक्त स्तरावर संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ मध्ये नमूद विहित संपूर्ण कालावधीकरिता करमणूक शुल्क माफी प्रदान करावी.

२. साठे चित्रमंदिर, आष्टा या एकपडदा चित्रपटगृहास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून करमणूक शुल्क माफी देण्यात येत आहे.

- शासनाने दि. २८ फंब्रुवारी, २०१३ रोजी निर्गमित शासन निर्णयातील मुद्दा क्र. अ (२४) मध्ये नमूद केल्यानुसार क्षेत्रनिहाय अनामत रक्कम जिल्हाधिकारी कार्यालयाने भरणा करुन घ्यावा.

- या चित्रपटगृहाद्वारे सशर्त हेतूपत्र प्रदान केल्यानंतर कोणत्याही स्वरुपाची अनियमितता केल्यास या चित्रपटगृहास दिलेली करमणूक शुल्क माफी सशर्त हेतूपत्र दिल्याच्या तारखेपासून रद्द करुन त्या तारखेपासून हाऊसफुल कपॅसिटीने या चित्रपटगृहाकडून करमणूक शुल्क वसूल केला जाईल, तसेच अनामत रक्कम जप्त करण्यात यावे.
- हेतूपत्र निर्गमित झाल्यानंतर या चित्रपटगृहाच्या व्यवस्थापनाने ३० दिवसाच्या कालावधीमध्ये या चित्रपटगृहाकरिता विहित अधिनियमांतर्गत परवाना तसेच तिकीट विक्री परवाना प्राप्त करुन घ्यावा. व त्याची प्रमाणित प्रत अप्पर जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन द्यावी.
- या चित्रपटगृहाच्या व्यवस्थापनाने शासनाने दि. २८ फेब्रुवारी, २०१३ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सर्व नियमांचे पालन करणे आवश्यक आहे.
- शासन निर्णयाद्वारे विहित सर्व विवरणपत्रे जिल्हाधिकारी कार्यालयास विहित कालावधीमध्ये भरणा करणे आवश्यक राहील.
- शासनाद्वारे भविष्यात निर्गमित करण्यात येणाऱ्या या संबंधातील कोणत्याही आदेशाचे पालन करणे चित्रपटगृह व्यवस्थापनास बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४०८२२१५४७४३९३१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Ramppa Hampayya

Digitally signed by Vidya Ramppa Hampayya
DN: CN = Vidya Ramppa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.22 17:30:44 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीकरिता**

१. विभागीय आयुक्त, पुणे
२. जिल्हाधिकारी, सांगली
३. उपआयुक्त (करमणूक शुल्क), पुणे विभाग
४. अप्पर जिल्हाधिकारी (करमणूक शुल्क), सांगली
५. व्यवस्थापक, साठे चित्रमंदिर, आष्टा, जि. सांगली